# मराठ्यांच्या लढायांचा इतिहास



कै. शिवराम महादेव परांजपे

(२७ जून महाड - २७ सप्टेंबर १९२९,

पत्रकार, साहित्यिक - काळ, मराठ्यांच्या लढायांचा इतिहास, )








मराठ्यांच्या लढायांचा इतिहास

या पुस्तकामध्ये मराठ्यांच्या कित्येक लढायांची वर्णने देण्यात आलेली आहेत. ही वर्णने पूर्वी चित्रमयजगत्च्या निरनिराळ्या अंकांतून निरनिराळ्या वेळी प्रसिद्ध झालेली असून हल्ली ती वर्णने एकत्र करून या पुस्तकाच्या रूपाने महाराष्ट्रीय वाचकांच्या पुढे ठेवण्यात येत आहे. या युद्धविषयक वर्णनांच्या लेखमाला प्रथमतः इ. स. १९२५ सालाच्या ऑगस्ट महिन्यापासून सुरुवात करण्यात येऊन ती लेखमाला इ. स. १९२८ च्या मे महिन्यापर्यंत चाललेली होती. ही लेखमाला चित्रमयजगत्च्या प्रत्येक महिन्याच्या अंकामध्ये नियमितपणे प्रसिद्ध होत असे, असे नाही. अनेक कारणांमुळे मध्यंतरी कित्येक वेळा प्रत्येक महिन्याला ही वर्णनं छापण्याकरिता देणे शक्य झालेले नव्हते. तेव्हा अशा प्रकारचे हे काही अपरिहार्य अपवाद सोडून बोलावयाचे झाल्यास ही लेखमाला चित्रमयजगतमध्ये सुमारे तीन वर्षेपर्यंत चालू होती. असे म्हणण्यास हरकत नाही. या लेखमालेत ज्या लढायांची वर्णने देण्यात आलेली आहेत, त्या लढायांच्या दृष्टीने या लेखमालेचे एकंदर अदमासे पंधरा भाग कल्पिलेले आहेत. त्यापैकी चौदा भागांत चौदा स्वतंत्र आणि मोठमोठ्या अशा लढायांची वर्णने असून "महाराष्ट्रातील किल्ले" या मथळ्याच्या एकाच भागामध्ये कुलाबा, सातारा, बेळगाव, सोलापूर, नाशिक, खानदेश वगैरे जिल्ह्यांतील निरनिराळ्या किल्ल्यांवर ज्या लढाया झाल्या, त्यांचा समावेश करण्यात आलेला आहे.

वरदा बुक्स
397/1 'वरदा', सेनापती बापट मार्ग, वेताळबाबा चौक, पुणे-16
020-25655654 मोबा. 8975530309 / 9423502920
E-mail : varadaprakashan@gmail.com
www.varadabooks.com
किंमत : 450/-

{"चित्रमय जगत" नियतकालिकात कै. शि.म. परांजपे यांच्या सिद्धहस्त लेखणीतून ऑगस्ट १९१५ ते मे १९२८ पर्यंत लेख प्रकाशित होत गेले. वरद प्रकाशनाने ते पुस्तक नंतर सन १९ मधे प्रसिद्ध केले. मजकूर मुळ लेखकाचा ठेवला आहे. लढाईच्या वर्णनाशिवाय त्यांचे भाष्य शक्यतो गाळले आहे. मजकुरात संलग्नपण येण्या इतपत संकलन माझे आहे. जिथे मला काही विचार व्यक्त करावेसे वाटतील तिथे कंसात किंवा टीप देऊन ते साधावे असे आत्ता विचार आहे.

लेखातील मजकुराच्या संदर्भातील लढाईचे चित्र सध्याचे प्रचलित नकाशे बनवून सादर करणे या उद्देशाने ही मालिका हाती घेतली आहे.

(लढाईच्या १८१८ पर्यंतच्या घटनापासून कै. शि. म. परांजपे साधारण १०० वर्षे दूर होते. आजच्या संदर्भात १०० वर्षे जवळ होते. अशा मध्यभागी राहून त्यांनी दिलेले १९२०च्या

सुमारातील गावे, शहरातील वाडे, गड, मंदिरांच्या नावांचे आधार, मिळाल्याने आपल्याला आजही जवळचे वाटतात.}

# मराठा साम्राज्याच्या परिसीमा सन १७६०

**पेशव्यांचा झेंडा - दूसरे बाजीराव**



**Peshwas of Maratha Empire**



Baji Rao II

| | |
|---|---|
| Residence | Shaniwar Wada |
| Appointer | Chhatrapati<br>Hereditary (1713–1818) |
| Formation | 1674 |
| First holder | Moropant Trimbak Pingle |
| Final holder | Bajirao II |
| Abolished | 3 June 1818 |
| Succession | None |

**ईस्ट इंडिया कंपनीचा झेंडा व माहिती**

**East India Company (EIC)**



Company flag (1801)



Coat of arms (1698)

**Motto:** *Auspicio Regis et Senatus Angliae*
"By command of the King and Parliament of England"

| | |
|---|---|
| Former type | Public |
| Industry | International trade, Opium trafficking[1] |
| Fate | Government of India Act 1858 |
| Founded | 31 December 1600 |
| Founders | John Watts, George White |
| Defunct | 1 June 1874 |
| Headquarters | London, Great Britain |
| Products | Cotton, silk, indigo dye, salt, spices, saltpetre, tea, and opium |

## पेशवे आणि इस्ट इंडिया कंपनी समोरा समोर - अफूची तस्करीचा व्यापार?

...

# प्रस्तावना

"महाराष्ट्रीय मनुष्याची पहिली जिज्ञासा स्वाभाविकपणे कोणत्या लढाईबद्दल बरे असणार ? आपण महाराष्ट्रीय, आपण महाराष्ट्रात राहातो. पुणे हे त्या महाराष्ट्रातील मुख्य शहर. त्या पुणे शहरात मोच्या वर्षांच्या पूर्वीपर्यंत पेशव्यांचे राज्य होते. ते राज्य आज कोठे आहे ? ... दुसऱ्या बाजीरावसाहेबांचे वेळी आपल्या स्वातंत्र्यविनाशाचा हा जो हृदयद्रावक परिणाम घडून आला, त्याला पूर्वकालीन कारणे काय-काय झाली असली पाहिजेत, याचा विचार मनात आला असता ते विचार करणारे मन साहजिकपणे बाजीरावसाहेबांनी 1802 साली वसई मुक्कामी इंग्रजांशी जो तह केला, त्या आद्य कारणाकडे वळते. तो वसईला इंग्रजांनी केलेला तह म्हणजे देशात आपल्या स्वातंत्र्याच्या संरक्षणाकरता मराठ्यांनी त्या वेळी बनविलेल्या मराठा कॉन्फिडरसीच्या किल्ल्याला लाविलेला एक गुप्त सुरुंगच होय. तेव्हा त्या संकटाच्या निवारणासाठी शिंदे, भोसले, होळकर यांनी इंग्लिशांच्या विरुध्द लढाई पुकारणे हे त्या वेळी त्यांना अगदी अपरिहार्यच होते आणि म्हणून अशा परिस्थितीमध्ये शिंदे, भोसले, होळकर, यांनी ज्या लढाया केल्या, त्यांचीही वर्णने यापुढे क्रमाक्रमाने देण्यात आलेली आहेत व अशा कारणांमुळे या लढायांचा क्रम येथे उलटासुलटा झालेला आहे.

... या दृष्टीने पाहाता हे प्रस्तुत बाबतीतील लेखकाच्या मन:स्थितीचे स्वरूप असून हे काही या क्रमाचे समर्थन नव्हे, हे कोणाही वाचकाच्या लक्षात येण्यासारखे आहे....

.... आपल्यापाशी चांगली हत्यारे नव्हती, किंवा आपण कवायती कंपू तयार करून लढू लागलो म्हणून आपले हे पराजय झाले, ही कारणमीमांसा बिलकुल चुकीची आहे. हे आपले पराभव आपल्या नैतिक अध:पाताने घडवून आणलेले आहेत. या पुस्तकात पुढे ज्या लढाया दिलेल्या आहेत, त्यापैकी कितीतरी ठिकाणी निव्वळ फितुरीमुळे आपले पराजय झाले असल्याचे आपल्याला आढळून येते. आणि ज्या लोकांच्या मनावर आपल्या धर्माच्या किंवा देशाच्या बंधनाचा मुळीच दाब उरलेला नसतो, आणि ज्यांना केवळ स्वार्थाशिवाय दुसरे काही दिसतच नसते, असेच नीच आणि निमकहराम लोक असली ही, फितुरीची कामे करण्याला उद्युक्त होतात. असले लोक पेशवाईच्या शेवटच्या दिवसात आपल्याकडे फार झालेले होते.

पुढील भाग २

## खडकीची लढाई

खडकीच्या एका लढाईने पुण्यातील हिंदुपदपातशाहीचे सगळे राज्यवैभव एकदम लयाला गेले असेल तरी कसे, असे त्या वेळी झाले असेल तरी काय, त्या वेळच्या स्वदेशाभिमानी आणि स्वराज्यप्रेमी लोकांनी आपल्या स्वातंत्र्याच्या संरक्षणासाठी काहीच प्रयत्न केले नसतील काय, आणि त्यांनी अनेक प्रयत्न केले असतानाही त्यांच्या त्या प्रयत्नांना यश येऊ नये'(?) ...

मिसळपाव. कॉम वरील काही प्रतिसाद.

उत्तम सुरवात ! पुढे वाचायची

1 Apr 2020 - 10:11 pm | *दुर्गविहारी*

उत्तम सुरवात ! पुढे वाचायची उत्सुकता लागली आहे.

इंग्रजांकडून कोण शिपाई लढत असावेत....

2 Apr 2020 - 8:44 pm | *शशिकांत ओक*

धाग्यावर काम करता असताना इंग्रजांकडून कोण नेटिव्ह शिपाई लढत असावेत? असे मनात येत होते...
याचे उत्तर उदय कुलकर्णींच्या एका अभ्यासपुर्ण लेखात ईसंस्कृती या ठिकाणी वाचायला मिळाले.

भाग १ खडकी ते कोरेगाव

The British also raised new troops. Raising the Poona Auxiliary Horse in July 1817 it was advertised that,
'The men to be Sunnis, Sheikhs, Moguls, Pathans, Scindeans (Sind), Baloochis, Shias, Hindustanis, Brahmins, Rajputs and Mahratta spearsmen – men of low caste not to be admitted – Mussulmans specially Syeds, Sheikhs and Hindustanees to be preferred..'

' मराठी माणसाची फन्दी-फितुरी'

16 Apr 2020 - 7:19 pm | *विनोद१८*

.... आपल्यापाशी चांगली हत्यारे नव्हती, किंवा आपण कवायती कंपू तयार करून लढू लागलो म्हणून आपले हे पराजय झाले, ही कारणमीमांसा बिलकुल चुकीची आहे. हे आपले पराभव आपल्या नैतिक अध:पाताने घडवून आणलेले आहेत. या पुस्तकात पुढे ज्या लढाया दिलेल्या आहेत, त्यापैकी कितीतरी ठिकाणी निव्वळ फितुरीमुळे आपले पराजय झाले असल्याचे आपल्याला आढळून येते. आणि ज्या लोकांच्या मनावर आपल्या धर्माच्या किंवा देशाच्या बंधनाचा मुळीच दाब उरलेला नसतो, आणि ज्यांना केवळ स्वार्थाशिवाय दुसरे काही दिसतच नसते, असेच नीच आणि निमकहराम लोक असली ही, फितुरीची कामे करण्याला उद्युक्त होतात. असले लोक पेशवाईच्या शेवटच्या दिवसात आपल्याकडे फार झालेले होते.

हे तर १००% सत्य आहे याबद्दल कुणाचे दुमत नसावे परन्तु दुर्दैवाने असेच नीच आणि निमकहराम लोक ज्यांना केवळ स्वार्थाशिवाय दुसरे काही दिसतच नसते, अशी माणसे आजही तुमच्या माझ्या अवतीभवती समाजात, राजकारणात अनेक आहेत.

यथावकाश असल्या लोकान्च्या बुडाला हादरे बसायला आता सुरवात झाली आहे एव्हढीच त्यातल्यात्यात समाधानाची बाब.

बाकी आपले लिखाण नेहमीप्रमाणेच छान.

# मानवी स्वभाव म्हणून पाहिले पाहिजे

16 Apr 2020 - 9:07 pm | *शशिकांत ओक*

नेतृत्व कणखर असेल तर...
महाराजांच्या काळात किती जणांनी मुघलांच्या सेनेत प्रवेश केला?
नेतोजी पालकर यांचेही परतणे महत्वपूर्ण होते. तेच मराठा सरदार संभाजी महाराजांच्या काळात दगाबाज़ होऊ लागले...
इंग्रजांना लाच देऊन त्यांना आपल्याकडे वळवून घेण्यात का यश आले नाही?
डलहौसी, वेलेस्ली,एल्फिन्स्टन वगैरेंनी आपल्या नंतर आपल्या मुलांना त्यांच्या जागी का नियुक्त केले नाही?
घराणेशाही मुगल, पेशवे आणि अन्य भारतीय रियासतीत का बंद झाली नाही?
रणांगणात जाऊन पराक्रम गाजवला तर सेनेवर वचक राहतो... पैसे चारून नाही! हे कोणी सांगितले नाही का?
आपले विचार जाणून घ्यायला आवडेल.